महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या मेमोरॅन्डम
ऑफ असोसिएशनमध्ये सुधारणा करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय:मासैनो २००५/६२२/प्र.क्र.११९/का.२८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ जून,२०१०.

वाचा: १)व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ मर्या.पुणे-४११००१ यांचे पत्र क्रमांक MESCO/Emp/Meet/१६५, दिनांक ०८.०४.२००५ व पत्र क्रमांक MESCO/Govt/Corres, दिनांक ३१.०८.२००९.
२)महाव्यवस्थापक,,महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ मर्या.पुणे-४११००१ यांचे पत्र क्रमांक मासैम/शासन/जनरल, दिनांक ०२.०६.२०१०.

प्रस्तावना :- महाराष्ट्र राज्यातील, सैन्यदलातील (भूदल/नौदल/वायुदल)निवृत्त होणाऱ्या माजी सैनिकांचे पुनर्वसन व्हावे आणि त्यांना निवृत्तीनंतर रोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात, उपजीविकेचे साधन उपलब्ध व्हावे म्हणून तसेच विविध योजनांची अंमलबजावणी अधिक परिणामकारकपणे करण्याकरीता महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाची स्थापना करण्यात आली आहे. या महामंडळाच्या ठळक उद्दिष्टांपैकी माजी सैनिकांना सरकारी, निमसरकारी, शासकीय महामंडळे व प्राधिकरण व खाजगी संस्थांमध्ये सुरक्षा क्षेत्रात नोकऱ्या उपलब्ध करुन देणे हे एक उद्दिष्ट आहे. माजी सैनिकांबरोबरच त्यांच्या कुटुंबियांच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने युध्द विधवांची मुले, युध्द विधवा, युध्दात अपंग झालेले सैनिक, इतर अपंग सैनिक ,माजी सैनिकांच्या विधवा, माजी सैनिकांचे पाल्य इत्यादींना सुध्दा रोजगारांची संधी उपलब्ध करुन देण्यासाठी महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशनमध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.
२. तसेच, महाराष्ट्र राज्य माजी सैनिक महामंडळाच्या यापूर्वीच रजीस्टर्ड झालेल्या मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशनला मा.राज्यपाल महोदयांची मंजुरी यापूर्वी घेतली नसल्याचे निदर्शनास आल्याने त्यांची कार्योत्तर मंजुरी घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांनी महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या यापूर्वीच रजीस्टर्ड झालेल्या मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशनला कार्योत्तर मंजुरी दिली आहे.
२. महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशन मधील विद्यमान कलम तीन खालील उद्दिष्टांपैकी (अ) १ ऐवजी खालीलप्रमाणे सुधारित मजकूर अंतभूत करण्यास मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांनी मान्यता दिली आहे :-

**"III. The objects for which the company is established are :**

**(A) THE MAIN OBJECT OF THE COMPANY TO BE PURSUED BY THE COMPANY ON ITS INCORPORATION :**

**1. To make available employment, business and occupational opportunities to the following persons/beneficiaries in the order of preference mentioned below in industries, commercial, educational, social establishments and departments including government, semi-government, co-operatives and corporations and private sector.**

**<u>Order of prefrence of Persons / Beneficiaries</u>**

**(1) Ex-Servicemen,**

**(2) Wife of defence personnel who met death for the cause of the nation,**

**(3) Son & daughter of defence personnel who met death for the cause of the nation ,**

**(4) Disabled / injured solider during war or due to his service in defence force,**

**(5) Disabled ex-servicemen,**

**(6) Widow of ex-servicemen**

**(7) Children of Ex-servicemen"**

**3.** वरीलप्रमाणे माजी सैनिक महामंडळाच्या मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशन मधील कलम तीन खालील उद्दिष्टांपैकी (अ) १ मध्ये सुधारणा करुन ती रजिस्टर करुन घेण्याबाबतची कार्यवाही व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ मर्या., पुणे-४११००१ यांनी कृपया त्वरित करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtr.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००६१११३१९३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

सही/-

(अ.द.जोशी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (माजी सैनिक कल्याण) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (माजी सैनिक कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ, रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, सोलापूर रस्ता, घोरपडी, पुणे - ४११ ००१.
संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय,रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर ,सोलापूर रस्ता,घोरपडी,पुणे - ४११ ००१.
सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी.
निवड नस्ती.